Convertion in Regular Temparary Establishment:- Shri.Manohar V. Devkate and Udhav G. Mhaske working under Jalvidnyan Prakalpa Nashik

कार्यव्ययी व रोजंदारी आस्थापनेवरील पदांचे अस्थायी आस्थापनेवरील पदांमध्ये रुपांतरण-- **श्री. मनोहर वि. देवकाते व श्री. उध्दव.जी. म्हस्के जलविज्ञान प्रकल्प नाशिक**

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग

शासन निर्णय क्र. रुअआ-२००८/ (४७/२००८)/आ(कामगार)

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- २०/५/२०११

**पहावे** :- १) शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग रु.अ.आ.१५९६/२२८/ सेवा-५, दि.२४.४.२००१

२) अधीक्षक अभियंता, जलविज्ञान प्रकल्प मंडळ, (संकलन ) नाशिक. यांचे पत्र जा. क्र.जविप्रम (सं)/आ-२/२५७७/१० दिनाक १०.८.२०१०

**प्रस्तावनाः**

अधिक्षक अभियंता, आधार सामग्री संकलन, नियोजन व जलविज्ञान मंडळ, नाशिक यांच्या नियंत्रणाखालील विभागीय कार्यालय, येथे श्री. मनोहर विठ्ठलराव देवकाते व श्री. उध्दव गुंडाजी म्हस्के यांची अनुक मे दि. २३.११.८८ व दि. ५.१.८७ रोजी कार्यव्ययी आस्थापनेवर मापी लिपिक, खलाशी मापी म्हणून नियुक्ती केली होती. दि ११.११.९१ रोजी काम उपलब्ध नसल्यामुळे त्यांना दि. १०.१०.९१ च्या आदेशान्वये कमी करण्यात आले होते. त्यामुळे त्यांनी सेवेत पुन्हा घेण्यासाठी मा. कामगार न्यायालय, औरंगाबाद येथे दावा क्रः युएलपी २२८/९१ दाखल केला. सदर दाव्याचा निर्णय दि. १३.११.९१ रोजी लागला. या निर्णयान्वये कामगारास दोन आठवडयात कामावर घेण्यात यावे, असा अंतरिम आदेश झाल्याने संबंधीत कार्यालयाने दि. १५.११.९१ पासून त्यांना पूर्ववत कामावर घेतले. त्यानंतर मूळ दावा मा. कामगार न्यायालय, जालना येथे वर्ग करण्यात आला व त्यास युएलपी क्र ५२/९१ देण्यात आला. त्यात संबंधित कामगारांनी त्यांना सेवेत कायम करण्याच्या तडजोडीनुसार दावे अनुकमे दि १६.११.२००२ व दि ३१.७.२००१ रोजी मागे घेतल्याचे न्यायालयाने मान्य केले. सदर प्रकरणी केलेली तडजोड शासन निर्णय दि. २४.४.०१ मधील परिच्छेद क : ३ नुसार केली असल्यामुळे श्री. देवकाते व श्री. म्हस्के यांना सदर शासन निर्णयातील तरतूदींप्रमाणे अकुशल मजुर या पदावर रुपांतरीत अस्थाई आस्थापनेवर घेण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

श्री. देवकाते व श्री. म्हस्के यांची नियुक्तीच्या दिनांकापासून म्हणजे अनुकमे दिनांक २३.११.८८ व दि ५.१.८७ पासून एका वर्षाच्या कालावधीत एकूण २४० दिवस इतकी सेवा झाली आहे. शासन निर्णय दि २४.४.२००१ मधिल तरतुदीनुसार श्री. देवकाते व श्री. म्हस्के यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा दिनांक ( २३.११.१९९३ व ५.१.१९९२ ) हा दिनांक ३१.१२.९८ पूर्वीचा असल्याने श्री. मनोहर विठ्ठलराव

देवकाते व श्री. उध्दव गुंडाजी म्हस्के यांच्या सेवा पुढीलप्रमाणे अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत करण्यात येत आहेत .

| अ. क्र | कर्मचाऱ्यांचे नाव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे पद व दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणावयाचा दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचे पद | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री. मनोहर विठ्ठलराव देवकाते | रोजंदारी | मापी लिपिक, २३.११.८८ | २३.११.९३ | अकुशल मजुर | रु.७५०-९४० (जुनी) रु.२५५०-३२०० (५ वा वेतन आयोग ) |
| २ | श्री. उध्दव गुंडाजी म्हस्के | रोजंदारी | खलाशी मापी ५.१.८७ | ५.१.९२ | अकुशल मजुर | रु.७५०-९४० (जुनी) रु.२५५०-३२०० (५ वा वेतन आयोग ) |

३. श्री. मनोहर विठ्ठलराव देवकाते व श्री. उध्दव गुंडाजी म्हस्के यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे त्यांना पुढील सवलती देण्यात येत आहेत :-

अ) अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत केलेल्या पदांकरिता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान/कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्यांचे बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यांत येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशी व्यतीरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट देखिल शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यांत येत आहे.

४. अधीक्षक अभियंता, यांनी या आदेशातील सर्व अटी व शर्ती विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत निर्गमित करुन ते संबंधित कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणावेत. तपशिलामध्ये संबंधित कर्मचाऱ्यांचे नांव , पदनाम, त्यांच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक, त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्याचा दिनांक यामध्ये कोणतीही चूक वा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी अशी बाब शासनाच्या निदर्शनास तात्काळ आणावी. क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी सदर आदेशात स्वतःच्या अधिकारात कोणतेही फेरबदल करु नयेत, तसेच हे आदेश संबंधित कर्मचा-यांच्या व्यक्तीशः निदर्शनास आणून शासनाने निर्गमित केलेल्या आदेशांच्या बाबतीत संबंधित कर्मचाऱ्यांची (नाव, पदनाम, त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक तसेच रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्याच्या दिनांकात दुरुस्ती इ. बाबतीत) कोणतीही तक्रार नसल्यास त्यांच्याकडून तशा

आशयाचे शासन निर्णय दि. २४.४.२००१ सोबतच्या प्रपत्र 'ब' मधील नमुन्यात हमीपत्र (Undertaking) घेवून ते त्या कर्मचाऱ्यांच्या सेवापटात /सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत_शासनाकडे पाठविला जाईल याबाबतीत संबंधीत अधीक्षक अभियंत्यांनी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत /त्रुटी असल्याची संबंधित कर्मचाऱ्यांची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरुपात घ्यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरुस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल याची दक्षता घ्यावी. दुरुस्ती प्रस्ताव पाठवितांना संबंधित कर्मचाऱ्यांच्या नेमणुकांच्या आदेशांच्या प्रती, हजेरी पटाच्या प्रती, आणि सेवापट पाठविण्याची खबरदारी घ्यावी.

५. श्री. मनोहर विठ्ठलराव देवकाते व श्री. उध्दव गुंडाजी म्हस्के यांना अकुशल मजूर पदावर रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांकापासून ते रुपांतरीत अस्थाई आस्थापनेवर घेण्याचा शासन निर्णय निर्गमित होईल त्या दिनांकापर्यंतची सर्व थकबाकी स्वखुशीने सोडून देण्यास तयार असल्याचे हमी पत्र लिहून दिले आहे. त्यामुळे त्यांच्या सदरहू कालावधीतील वेतनाच्या फरकाची थकबाकी अनुज्ञेय असणार नाही. तथापि त्यांची वेतन निश्चिती त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांकापासून करण्यात यावी.

६. प्रस्तुत प्रकरणातील सदर कर्मचा-यांवर वेतनापोटी होणारा खर्च सन २०११-१२ या आथिक वर्षात संबंधित लेखाशिर्षाखाली मंजुर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

७. हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. रुअआ १५९६/२२८/सेवा-५, दि. २४ एप्रिल २००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन काढण्यात येत आहेत.

८. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सांकेतांक कमांक :२०११०५२०१५५७०१००१ अन्वये प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सोबत: प्रपत्र ब

**( डॉ. माधव वीर )**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत :-**

वित्त विभाग (व्यय १२), मंत्रालय, मुंबई
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र १, मुंबई / महाराष्ट्र- २, नागपूर
महालेखापाल, लेखा परिक्षा , महाराष्ट्र -१,मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर
अधिक्षक अभियंता, जलविज्ञान प्रकल्प मंडळ, (संकलन ) नाशिक
कार्यकारी अभियंता, जलविज्ञान प्रकल्प मंडळ, औरंगाबाद
आस्थापना(कामगार) संग्रहार्थ.